**करपरा मध्यम प्रकल्प ता. जिंतूर जि.परभणी विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. दुरुस्ती-२००९(२९५/२००९)/सिंव्य(कामे)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २१.१२.२०१०

पहावे : १) मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद यांचे पत्र क्र.लाक्षेवि/जसंवि/तां.२/करपरा म.प्र./७६५६/वप्र, दि.०७.११.२००८.
२) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्र.जा.क्र.गोमपाविम/तां-१/सिंव्य/करपरा/८२४३, दि.२९.०९.२०१०

**प्रस्तावना :**

गोदावरी खोऱ्यातील करपरा नदीवरील करपरा मध्यम प्रकल्पाचे बांधकाम सन १९७४ मध्ये पूर्ण झाले आहे. या प्रकल्पाची साठवण क्षमता २८.८२ दलघमी इतकी असून २१४१ हे. क्षेत्र सिंचन करण्यासाठी नदीच्या उजव्या तिरावर २.२३५ घमी/सेकंद वहन क्षमतेचा २४.२० किमी. लांबीचा कालवा काढण्यात आला आहे. प्रकल्पीय उपयुक्त पाणीसाठा २४.९० दलघमी आहे.

करपरा मध्यम प्रकल्प पूर्ण भरल्यानंतर सांडव्यातून सुमारे १५क्युसेस गळती होते. तसेच सिंचन प्रणाली व्यवस्थित नसल्याने मोठया प्रमाणात पाणी वाया जाते. यास्तव करपरा मध्यम प्रकल्पाच्या विशेष दुरुस्ती कामाबाबत मा. मंत्री, जलसंपदा यांचे अध्यक्षतेखाली दि.०५.०६.२००७ रोजी झालेल्या बैठकीच्या कार्यवृत्तानुसार करपरा मध्यम प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या कामांना मा.मंत्री, जलसंपदा यांनी तत्वतः मान्यता दिली आहे.

या प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीनंतर धरणामध्ये ८.५० दलघमी अतिरिक्त पाणीसाठा होणार आहे. प्रकल्पिय सिंचन क्षेत्र कायम ठेवून १०७८ हे. सिंचन क्षेत्र पुनर्स्थापित होणार आहे. अतिरिक्त पाणीसाठा ८.५० दलघमीचा वापर रब्बी हंगामात करण्याचे प्रयोजन असून प्रकल्पीय पिक रचनेमध्ये सुधारणा केल्याने रब्बी हंगामात सिंचन क्षेत्रास फायदा होणार आहे. या बाबीचा विचार करुन करपरा मध्यम प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

या शासन निर्णयान्वये करपरा मध्यम प्रकल्पाच्या विशेष दुरुस्तीच्या रु.९१२.९६ लक्ष ( रुपये नऊशे बारा लक्ष शहाण्णव हजार मात्र) (कामाप्रित्यर्थ रु.७३४.७७ लक्ष (रुपये सातशे चौतीस लक्ष सत्ताहत्तर हजार मात्र) व अनुषंगिक खर्च रु.१७८.१९ लक्ष (रुपये एकशे अठठयाहत्तर लक्ष एकोणिस हजार मात्र)) खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) सदर प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पध्दतीचे शेतकऱ्याकडून व्यवस्थापन अधिनियम-२००५ लागू करावा व त्यातील कलम ६ नुसार प्रकल्प अधिसुचित करण्यात यावा. अशी अधिसुचना काढल्यानंतरच प्रस्तावित दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत.

२) शासन निर्णय क्र. मजसुप्र-१००६/(६८८/०६)लाक्षेवि(कामे), दि.१४.०६.२००७ अन्वये लघु वितरिकास्तरीय पाणी वापर संस्थाच्या कार्यक्षेत्रातील हस्तांतरपूर्व / विशेष दुरुस्तीची कामे कंत्राटव्यवस्थापन समिती स्थापन झाल्यानंतरच हाती घेण्यात यावीत.

३) या कामावर होणारा खर्च लेखाशिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील इतर उपक्रमातील गुंतवणुका, १० विस्तार व सुधारणा कार्यक्रमांतर्गत मराठवाडा विभागास भागभांडवली अंशदान (योजनांतर्गत) (१०) (०२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ जे १४९) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

४) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतुदीच्या मर्यादेत करण्यात यावेत.

५) या योजनेस प्रदान केलेली मुळ प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र.५ सन २०१०-११ वर नोंदविण्यात आली आहे.

हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३३८ व्यय-१२, दि.०९.११.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात येत असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१०१२२१२०३७४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सहपत्र :- परिशिष्ट

( सं. दे. कुलकर्णी )
शासनाचे उप सचिव

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई

मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई

मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई
स्वीय सहाय्यक, सचिव (जलसंपदा) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि) मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
मु.अ.(पा.) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
सहसचिव, वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
सहसचिव, नियोजन विभाग, १४३४ कार्यासन मंत्रालय, मुंबई
आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (सिं.व्य.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (निवस), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, औरंगाबाद
अवर सचिव, सिं.व्य.(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी अभियंता, जायकवाडी पाटबंधारे विभाग, परभणी
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्र. दुरुस्ती-२००९(२९५/२००९)/सिंव्य(कामे) दि. २१/१२/२०१० चे सहपत्र**

करपरा मध्यम प्रकल्प ता. जिंतूर जि.परभणी विशेष दुरुस्तीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**परिशिष्ट**

| **अ.क्र.** | **शिर्ष/ उपशिर्ष** | **अंदाजित किंमत (रु. लक्ष)** |
|---|---|---|
| | **मुख्यशिर्ष कामे** | |
| १ | सी-वर्क्स धरण | ५७४.६७ |
| | **मुख्य कालवा व शाखा कालवा** | |
| १ | डी-विमोचके | २.१८ |
| २ | इ-प्रपात | ०.२६ |
| ३ | जी-पूल | २५.२४ |
| ४ | एच-अतिवाहक | ०.११ |
| ५ | एल-मातीकाम कालवा | ५२.२२ |
| | **वितरिका** | |
| १ | डी-विमोचके | ४.२४ |
| २ | इ-प्रपात | २५.२१ |
| ३ | जी-पूल | ५.१७ |
| ४ | एल-मातीकाम कालवा | ४५.४७ |
| | **कामाप्रित्यर्थ एकूण खर्च** | **७३४.७७** |
| | **अनुषंगिक खर्च** | **१७८.१९** |
| | **योजनेचा एकूण खर्च** | **९१२.९६** |